**ई प्रशासन अंतर्गत ऑनलाईन प्रशिक्षण व वेबिनार आयोजित करण्यासाठी आवश्यक प्रणालीच्या subscription चे एक वर्षासाठी नुतनीकरण करणे बाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईप्रशा २०२२/(२८/२०२२)/लपा**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१/०२/२०२२

**प्रस्तावना-**

सध्याच्या कोविड-१९ महामारीच्या परिस्थितीमध्ये प्रशिक्षण शिबीर आयोजित करण्यामध्ये अडचणी निर्माण होत आहेत. त्यानुषंगाने विभागातील विविध प्रशिक्षणे आणि बैठका ऑनलाइन प्लॅटफॉर्मद्वारे आयोजित करण्याकरिता जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, पुणे यांचेकडून प्रस्तावित "GoToWebinar" व "GoToTrainig" या सॉफ्टवेअरअरला ई-प्रशासन अंमलबजावणी समितीकडून १ वर्षासाठी मान्यता देण्यात आली होती. जलसंपदा विभागांतर्गत विविध अधिकाऱ्यांनी प्रशिक्षणासाठी व वेबीनारसाठी सदर प्रणालीचा लाभ घेतला आहे. ऑनलाइन वेबीनारमुळे व्याख्यात्यांना आपापल्या ठिकाणी राहून व्याख्यान देता आले व त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ विभागातील अधिकाऱ्यांना झाला.

तसेच या प्रणालीच्या साहाय्याने सर्व वेबीनारचे रेकोर्डिंग करणे सहज शक्य झाले असून व्याख्यानानंतर ते विभागाच्या संकेतस्थळावर तसेच युट्यूब चॅनेलवर अपलोड केले आहेत. या प्रणालीच्या साहाय्याने प्रशिक्षणानंतर सर्व प्रशिक्षणार्थींची ऑनलाइन परीक्षा घेता येते व त्यांच्या प्रशिक्षणाची ऑनलाइन प्रशस्तीपत्रके देखील या प्रणालीत तयार होतात व ती त्यांच्या नोंदणीकृत ई-मेल पत्त्यावर आपोआप वितरित होतात. अशा प्रकारे सदर प्रणाली वापरासाठी अत्यंत user friendly आहेत. सद्य:स्थितीत उपरोक्त प्रणालींचे १ वर्षाचे license दिनांक ०८/११/२०२१ रोजी संपुष्टात आले आहे. तरी सदर प्रणालींच्या license चे १ वर्षासाठी नुतनीकरण करणेस (subscribe करणे) रु.६,००,५९१ /- किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालील प्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय-**

जलसंपदा विभागासाठी सदर प्रणालीची उपयुक्तता व व्याप्ती विचारात घेता सदर प्रणालींच्या license चे १ वर्षासाठी नुतनीकरण आवश्यक असल्याने त्यासाठी येणाऱ्या वार्षिक एकदा द्यावयाच्या रु.६,००,५९१ /-(सहा लक्ष पाचशे एक्याण्णव फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

शासन निर्णय क्र.ई-प्रशासन २०१३/(२७/१३)/लपा-१, दिनांक १२/०३/२०१३ व शासन पत्र क्र.संकीर्ण २०१५/(२३१/१५)/लपा-१, दिनांक १२/१०/२०१५ नुसार रू.१० लक्ष पर्यंतच्या ई-प्रशासन प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत, त्यानुसार मंजूरी देण्यात येत आहेत.

या करिता होणारा ३४५१- सचिवालयीन आर्थिक सेवा ०३०-सचिवालय (०१) जलसंपदा विभाग आस्थापना (०१) (०३) ई-गर्व्हनन्स प्रकल्प-१७ संगणक खर्च योजनांतर्गत (३४५१-२७१९) या लेखाशिषांतर्गत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२२११४५९१५३९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rekha Ajit Bhawar
Date: 2022.02.21 15:02:29 +05'30'

**( रेखा भवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सर्व मा. मंत्री/मा. राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) विरोधी पक्ष नेते विधान परिषद/विधान सभा.
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (ले व को) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास मंहामंडळ
१३) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपुर.
१४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा), मुंबई/नागपुर.
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६) कोषागार अधिकारी, पुणे/नागपुर/औरंगाबाद/ठाणे/जळगाव.
१७) मुख्य अभियंता, (वि.प्र.) , जलसंपदा विभाग, पुणे.
१८) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता, जलसंपदा, ई-प्रशासन मंडळ, पुणे.
२०) कार्यासने अर्थ-१/२/ लेखा/ निवसं, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) लपा कार्यासन संग्रहार्थ.